**वित्तीय वर्ष २०१८-१९ करीता राज्यात औद्योगिक पायाभूत सुविधांची निर्मिती व विकासा संदर्भात प्राप्त प्रस्तावांना निधी उपलब्ध करुन देणेबाबत. (लोणावळा, पाचोरा, नानेकरवाडी कुरुळी-चाकण व येवले औद्योगिक वसाहती)**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र.औपासू- २०१८/प्र.क्र.२०१/उद्योग-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २१ जानेवारी, २०१९

**विषय** : राज्यात औद्योगिक पायाभूत सुविधांची निर्मिती व विकासा संदर्भात प्राप्त प्रस्तावांना सन २०१८-१९ या वित्तीय वर्षाकरीता निधी उपलब्ध करुन देण्याबाबत (लोणावळा, पाचोरा, नानेकरवाडी कुरुळी-चाकण व येवले औद्योगिक सहकारी वसाहती)

**संदर्भ** : १) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्रमांक. आय आय आय पॉलिसी २०१०/प्र.क्र.७६८/उद्योग-२, दि.२२.२.२०१३

२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र. औपासू २०१२/प्र.क्र.२३४/उद्योग-२, दिनांक २५.२.२०१४

३) दिनांक १९.१२.२०१४ रोजी झालेल्या सुकाणू समितीच्या दुसऱ्या बैठकीचे इतिवृत्त दि. ६.१.२०१५

४) दि.३१.१२.२०१५ रोजी झालेल्या सुकाणू समितीच्या तिसऱ्या बैठकीचे इतिवृत्त दि.०८.०३.२०१६

५) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.मऔधो-२०१५/प्र.क्र.३९/उद्योग-२, दिनांक २८.३. २०१६.

६) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग शासन शुध्दीपत्रक क्र. औपासू-२०१६ / प्र.क्र.२१९/ उद्योग-२, दि.२०.१२.२०१६.

७) उद्योग, उर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र. औपासू-२०१६/प्र.क्र २२६/उद्योग-२, दिनांक २७.१२.२०१६

८) उद्योग सह संचालक (साप्रोयो), उद्योग संचालनालय यांचे क्र. उसं/ साप्रोयो/ पायाभूत सुविधा/ २०१८/अे-५६१, दिनांक १७/०३/२०१८ रोजीचा प्रस्ताव.

९) उद्योग,उर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र.औपासू-२०१७/प्र.क्र ९१/उद्योग-२, दिनांक २१.०३.२०१८.

१०) कार्यकारी अभियंता, जव्हार (पी.डब्ल्यू) विभाग, सार्वजनिक बांधकाम विभाग जव्हार, जि. पालघर यांचे पत्र क्र. पी.डब्ल्यू/जव्हार/बजेट/३८८, दिनांक ६.२.२०१७

११) कार्यकारी अभियंता, सां.बां.विभाग, जव्हार, जि. पालघर यांचे जावक क्र. /सां.बां./ वि.ज./अर्थ/७७५/२०१८, दि. १६.३.२०१८.

१२) मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई यांचे क्र. MIDC/FUNDS/D95889/2018 दिनांक २८.११.२०१८ व १४.१२.२०१८ चे पत्र व सहपत्र.

१३) मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई यांचे अनुक्रमे क्र. MIDC/FUNDS/A18740/2019 व क्र. MIDC/FUNDS/A18740/2019 ची दिनांक १४.१.२०१९ ची पत्रे व सहपत्र.

१४) मुख्य अभियंता (वितरण), महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी लिमिटेड (महावितरण), प्रकाशगड, वांद्रे (पूर्व), मुंबई यांचे पत्र क्र. मु. अ. (वितरण)/वि-३/सुकाणू/११४७ दिनांक १० जाने, २०१९.

१५) कार्यकारी अभियंता, बांधकाम विभाग उत्तर, जिल्हा परिषद सातारा, सातारा यांचे जा.क्र. बांध/उ/लेखा-१ /४६४/१८ दिनांक ०५/०६/२०१८.

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाचे मुख्य लेखा अधिकारी यांनी संदर्भाधीन क्र. १२ व १३ येथे नमूद पत्रान्वये राज्यात औद्यागिक पायाभूत सुविधांची निर्मिती व विकास या योजनेंतर्गत सन २०१५-१६ व सन २०१६-१७ करीता वितरीत निधीची उपयोगिता प्रमाणपत्रे व योजनेंतर्गत महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाकडून हाती घेण्यात आलेल्या कामांची सद्य:स्थिती शासनास कळविली आहे.

कार्यकारी अभियंता, सां.बां.विभाग, जव्हार, जि. पालघर यांनी संदर्भाधीन क्र. १० व ११, मुख्य अभियंता(वितरण), महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी लिमिटेड (महावितरण) यांनी संदर्भाधीन क्र. १४ तसेच कार्यकारी अभियंता, बांधकाम विभाग उत्तर, जिल्हा परिषद सातारा यांनी संदर्भाधीन क्र. १५ च्या पत्रान्वये सन २०१५-१६ व सन २०१६-१७ (सुधारित वितरण आदेशासह) करीता सदर योजनेअंतर्गत वितरीत निधीची उपयोगिता प्रमाणपत्रे व प्रकल्पांची सद्य: स्थिती शासनास सादर केली आहे.

सदर योजनेसाठी सन २०१७-१८ करीता रुपये ५.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला होता. सदर तरतूदीसंदर्भात वित्त विभागाच्या दिनांक ६/२/२०१८ च्या परिपत्रकात विहित करण्यात आलेल्या मर्यादेत लोणावळा, सिन्नर, पाचोरा व येवले या चार औद्योगिक वसाहतींना दि. २१/०३/२०१८ च्या शासन निर्णयान्वये रुपये ३.९२ कोटी इतका निधी वितरीत करण्यास मंजूरी देण्यात आली होती. तथापि महालेखापाल कार्यालय, मुंबई (ऑडीट) यांच्या तपासणीपथकाने शासनाने दिनांक २१/०३/२०१८ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यास मान्यता दिलेला रुपये ३.९२ कोटी निधी विकास आयुक्त (उद्योग)(आहरण व संवितरण अधिकारी) यांनी संबधित कार्यान्वयन यंत्रणेस परीक्षणाचे काम सुरु असेपर्यंत अदा झालेला नाही, असा मुद्या उपस्थित केला. याबाबत अधिक माहिती घेतली असता असे निदर्शनास आले की लेखा व कोषागार कार्यालयाने सदरहू रकमेचे देयक ३१ मार्च, २०१८ अखेर पारित ने केल्यामुळे ही रक्कम अदा होवू शकली नाही. त्यामुळे दिनांक २१/०३/२०१८ च्या शासना निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला रुपये ३.९२ कोटी इतका निधी व्यपगत झाल्याचे शासनास निदर्शनास आले. या बाबीचे गांभीर्य लक्षात घेता, सह संचालक (साप्रायो), सदस्य सचिव व उद्योग संचालनालयातील सदर योजनेचे काम हाताळणाऱ्या संबंधित कर्मचाऱ्यांविरुध्द शिस्तभंगविषयक कार्यवाही करण्याबाबत शासनाच्या दिनांक १० सप्टेंबर, २०१८ च्या सह सचिव (उद्योग) यांच्या स्तरावरील अ. शा. पत्राने व दिनांक २६ ऑक्टोबर, २०१८ च्या पत्रान्वये विकास आयुक्त (उद्योग) यांना कळविले आहे.

या योजनेअंतर्गत सन २०१८-१९ करिता रु. ५ कोटी इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. शासनाच्या दि. २१/३/२०१८ च्या शासन निर्णयान्वये लोणावळा/नागरगांव, सिन्नर, पाचोरा व येवले या चार औद्योगिक वसाहतींना वितरीत करण्यास मंजूरी देण्यात आलेला रुपये ३.९२१० कोटी इतका निधी व्यपगत झाल्याने सदर औद्योगिक वसाहतींना चालू कामासाठी निधी वितरीत करणे आवश्यक असल्याने त्यांना निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

१. राज्यात औद्योगिक पायाभूत सुविधांची निर्मिती व विकास या योजनेअंतर्गत मा.मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील "महाराष्ट्र औद्योगिक पायाभूत सुविधा विकास समिती" च्या दिनांक १९.१२.२०१४ व दिनांक ३१.१२.२०१५ रोजी झालेल्या बैठकीत दिलेली मान्यता व संदर्भ क्र. ७ अन्वये दिलेली प्रशासकीय मान्यता विचारात घेऊन, निधीच्या उपलब्धतेनुसार लोणावळा/नागरगाव येथील लोणावळा औद्योगिक वसाहतीमधील पायाभूत सुविधा, पाचोरा सहकारी वसाहत येथील पायाभूत सुविधा, चाकण जिल्हा पुणे येथील नानेकरवाडी कुरुळी औद्योगिक वसाहत येथील पायाभूत सुविधा व येवले सहकारी औद्योगिक वसाहत या प्रकल्पासाठी खाली दर्शविल्याप्रमाणे एकूण रु. ३,५०,००,०००/- (रुपये तीन कोटी पन्नास लाख फक्त) इतकी रक्कम विकास आयुक्त (उद्योग) यांनी आहरण करुन महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ या कार्यान्वयन यंत्रणेकडे सुपूर्द करण्यास, खालील अटींच्या अधिन राहून शासन याव्दारे मान्यता देत आहे.

**विवरणपत्र**

| अ. क्र. | पायाभूत सुविधा प्रकल्प | कार्यान्वयन यंत्रणा | सुकाणू समितीने मान्यता दिल्यानुसार पायाभूत निधीतून द्यावयाची रक्कम (रु.लाखात) | मऔवि. मंडळास सह. औद्यो. वसाहतीकडून प्राप्त हिस्स्याची रक्कम (रु. लाखात) | सदर योजने अंतर्गत वितरीत निधी (रुपये लाखात) | मऔविम ने काम पूर्ण होण्यासाठी दि.१४.१.१९ च्या पत्रान्वये शासनाकडे मागणी केलेली रक्कम (रु. लाखात) | वितरीत करावयाची उर्वरित रक्कम (रुपये लाखात) |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | पाचोरा सहकारी औद्योगिक वसाहत (पायाभूत सुविधा), जळगांव | MIDC | १०६.०३५ | ३५.३४५ | ७०.०० | २१.४३ | २१.४३ |
| २ | येवले सहकारी औद्योगिक वसाहत (पायाभूत सुविधा), नाशिक | MIDC | ९०.७५ | ३०.२५ | ६०.०० | २३.७५ | २३.७५ |
| ३ | नानेकरवाडी कुरुळी, चाकण औद्योगिक क्षेत्र | MIDC | ३६०.३४५ | १२०.०० | ८०.०० | २००.३२ | २००.३२ |
| ४ | लोणावळा सहकारी औद्योगिक वसाहत, पुणे | MIDC | ३००.३२२५ | १००.११ | ५०.०० | २२७.९७ | १०४.५० |
| | **एकूण** | | **८५७.४५२५** | **२८५.७०५** | **२६०.००** | **४७३.४७** | **३५०.००** |

**अटी :-**

१) सदर प्रकल्पांचे नकाशे व अंदाजपत्रकास महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाने तपासणी करुन देण्यात आलेल्या तांत्रिक मान्यतेच्या अधिन राहील.

२) सोबतच्या पत्रात नमूद केलेल्या खर्चाचे काम पूर्ण होईपर्यंत झालेल्या प्रकल्पाच्या खर्चातील वाढ ( Cost Escalation ) महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ स्वत:च्या निधीतून उपलब्ध करुन कामे पूर्ण करणे आवश्यक राहील.

३) सदर प्रकल्पांवर अन्य कोणताही विभाग अथवा संस्थांकडून खर्च झालेला नाही याची खातरजमा कार्यान्वयन यंत्रणेने (महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाने) करुन घ्यावी.

४) शासन निर्णय क्र.औपासू-२०१२/प्र.क्र.२३४/उद्योग-२,दिनांक २५.२.२०१४ मधील कार्यपध्दती व मार्गदर्शक तत्वांचे पालन आहरण व संविरण अधिकारी व कार्यान्वयन यंत्रणा यांनी कराव्यात.

५) कार्यान्वयन यंत्रणा उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी संदर्भात प्रकल्पनिहाय उपयोगिता प्रमाणपत्र व कामाचा पूर्तता अहवाल विकास आयुक्त(उद्योग) यांनी शासनास सादर करावा.

६) विकास आयुक्त (उद्योग) यांनी ३१.०३.२०१९ पर्यंत खर्च होणारा निधी कोषागरेमधून काढावा व जास्तीचा निधी कोषागरेमधून काढून अन्य संस्थांकडे जमा करु नये.

२. ही शासन मान्यता संदर्भीय क्र. ३ व ४ येथे नमूद केलेल्या सुकाणू समितीच्या अनुक्रमे दि. १९.१२.२०१४ व ३१.१२.२०१५ रोजी झालेल्या दुसऱ्या व तिसऱ्या बैठकीमध्ये प्राप्त मंजूरी व सदरहू बैठकीतील सूचनांनुसार अवलंबवायच्या कार्यपध्दती, तसेच उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र.औपासू-२०१२/प्र.क्र.२३४/उद्योग-२, दि.२५.२.२०१४ मधील तरतूदीच्या अधीन राहील. कार्यान्वयन यंत्रणेने व आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर तरतूदीप्रमाणे कार्यवाही करावी.

३. सदर कामासाठी येणारा खर्च लेखाशीर्ष क्र.के-१०, मुख्य लेखाशीर्ष, "४८७५, इतर उद्योगावरील भांडवली खर्च" उपलेखाशीर्ष ६०-इतर उद्योग, ८०० इतर खर्च, ८०० (००) (०१), "औद्योगिक पायाभूत सुविधांचा विकास व निर्मिती" (योजनांतर्गत) (४८७५-००२५) या योजनेखाली वित्तिय वर्ष २०१८-१९ करीता मंजूर असलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. लोणावळा/नागरगाव येथील लोणावळा औद्योगिक वसाहतीमधील पायाभूत सुविधा, पाचोरा सहकारी वसाहत येथील पायाभूत सुविधा व येवले सहकारी औद्योगिक वसाहत व नानेकरवाडी कुरुळी, चाकण औद्योगिक क्षेत्र येथील पायाभूत सुविधा या प्रकल्पासाठी परि. १ मध्ये नमूद विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे एकूण रु.३,५०,००,०००/- (रुपये तीन कोटी पन्नास लाख) एवढ्या रकमेच्या आहरणाचे आणि महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाला वितरित करण्याचे अधिकार विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांचे कार्यालयातील लेखाधिकारी यांना देण्यात येत आहेत.

५. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई यांना कळविण्यात येते की, सदर रकमांचे धनादेश,"मुख्य अभियंता, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई," यांचे नांवे काढून त्यांना अदा करण्यात यावे.

६. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेल्या रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाकडून प्राप्त करुन, विकास आयुक्त(उद्योग) यांनी शासनास सादर करावे.

७. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२ एप्रिल, २०१८ व त्या सोबतचे परिशिष्ट नुसार असे प्रमाणित करण्यात येते की, प्रस्तुत प्रकल्पाच्या खर्चाच्या बाबीस संदर्भ क्र. ७ अन्वये प्रशासकीय मंजूरी प्रदान करण्यात आलेली आहे. या योजनेंतर्गत २०१६-१७ वर्षी

वितरित केलेल्या अनुदानाच्या ७५% हून अधिक रकमेचा विनियोग पूर्ण झाल्याचे सार्वजनिक बांधकाम विभाग व महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाने अनुक्रमे संदर्भ क्र. १० ते ११ तसेच क्र. १२ ते १३ अन्वये कळविले आहे. परि. १ येथे नमूद सदर चार प्रकल्पांसाठी यापूर्वी या योजनेतून वितरीत केलेल्या अनुदानाच्या रकमेच्या ७५% अधिक रकमेचा विनियोग पूर्ण झाल्याचे म.औ.वि.म.ने कळविले आहे. तसेच सदर प्रकल्पांसाठी सन २०१७-१८ करीता या योजनेसाठी वितरीत करण्यात आलेला निधी व्यपगत झाला असल्याने तसेच त्यासंदर्भात विभागाच्या लेखापरिक्षणादरम्यान लेक्षाआक्षेप नोंदविण्यात आल्याने उद्योग संचालनालयातील संबंधित अधिकारी व कर्मचारी यांचेविरुध्द शिस्तभंगाची कार्यवाही प्रस्तावित करण्यात आली आहे. ही योजना वैयक्तिक लाभार्थ्यांची नाही. या सर्व बाबी लक्षात घेऊन प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार वरील निधी वितरित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०१९०१२११७१७४१९२१० असा आहे. हे शासन ज्ञापन डिजेटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Shamkant Degaonkar

Digitally signed by Sanjay Shamkant Degaonkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry, Energy and Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=de0a2ca7914a3c02f24aa23655f609f41f2d36b0ec57da4c71f19aaf08230a79, serialNumber=56cf8c8577584adc42f070185c585c41084cc34f6683553d21ccacbfa33d4d1f, cn=Sanjay Shamkant Degaonkar
Date: 2019.02.01 12:50:52 +05'30'

( संजय देगांवकर )
सह सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षण), मुंबई,
२) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षण), नागपूर,
३) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
४) निवासी लेखा परीक्षण अधिकारी, मुंबई,
५) विकास आयुक्त(उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई-४०० ०३२
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
७) मुख्य अभियंता, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
८) मे. लोणावळा/नागरगाव सहकारी औद्योगिक वसाहत,जि. पुणे.
९) मे. चाकण-पुणे येथील नानेकर वाडी कुरुळी औद्योगिक क्षेत्र, चाकण, जि. पुणे.
१०) मे. सहकारी औद्योगिक वसाहत पाचोरा, जि. जळगांव.
११) मे. येवले औद्योगिक सहकारी वसाहत मर्यादीत, येवले, जि. नाशिक.
१२) वित्त विभाग, (कार्यासन अर्थसंकल्प-१४/व्यय-१६) मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१३) नियोजन विभाग, (कार्यासन-१४६१), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१४) कक्ष अधिकारी(प्रशासन-१), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१५) निवडनस्ती (उद्योग-२)